**राज्यातील वरिष्ठ प्राथमिक (इयत्ता ५ वी ते ७ वी) शाळेत शिक्षण घेत असणाऱ्या अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थ्यांच्या उपस्थितीकरिता पालकांना प्रोत्साहन भत्त्याकरिता अनुदान उपलब्ध करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक अविवि-२०१०/प्र.क्र. ३८/का-७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २० सप्टेंबर, २०१०.**

संदर्भ :- शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक - अविवि-२०१०/प्र.क्र. ३८/का-७, दि. १४ जून, २०१०.

**शासन निर्णय :-**

संदर्भांकित शासन निर्णयान्वये राज्यातील शासन मान्यताप्राप्त वरिष्ठ प्राथमिक शाळेत शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्यांक समाजातील (मुस्लिम, बौध्द, शीख, ख्रिश्चन, जैन व पारशी) विद्यार्थ्यांचे शाळा गळतीचे प्रमाण रोखून त्यांना शिक्षण घेण्यास प्रेरीत करण्यासाठी राज्यातील सर्व शासन मान्य शासकीय तसेच खाजगी अनुदानित व विनाअनुदानित (इंग्रजी माध्यमाच्या कायम विनाअनुदानित शाळा वगळून) शाळांमध्ये इयत्ता ५वी ते ७ वी मध्ये शिकणाऱ्या व शाळेत नियमित उपस्थित राहणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पालकांना उपस्थिती भत्ता (प्रोत्साहन भत्ता) देण्याबाबतची योजना सन २०१०-११ या शैक्षणिक वर्षात राबविण्यासाठी मंजूरी देण्यात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी रु.१८,००,००,०००/- (रुपये अठरा कोटी फक्त) एवढया रकमेची तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी पहिल्या टप्प्यातील रु. ६,००,००,०००/- (रुपये सहा कोटी फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पहातील.

शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या योजनेसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या एकूण रु. ६,००,००,०००/- (रुपये सहा कोटी फक्त) एवढ्या निधीच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून या रकमेचे आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

राज्य शासनाच्या शालेय शिक्षण व क्रीडा विभाग किंवा अन्य विभागांमार्फत राबविण्यात येत असलेल्या तसेच केंद्र शासनाच्या या स्वरुपाच्या विद्यमान योजनांच्या माध्यमातून अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या पालकांना प्रोत्साहन(उपस्थिती )भत्ता मिळत असल्यास अशा विद्यार्थ्यांना या योजनेतून दुहेरी लाभ अनुज्ञेय असणार नाही. मात्र अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या पालकांना इतर प्रचलित योजनांमधून मिळत असलेली प्रोत्साहन भत्त्याची रक्कम या योजनेतून अनुज्ञेय असणाऱ्या प्रोत्साहन भत्त्यापेक्षा कमी असल्यास त्यांना यामधील फरकाची रक्कम देय राहील.

या योजनेंतर्गत होणारा खर्च क्र.झेड ई-१ , मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०५) प्राथमिक शाळांच्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या उपस्थितीकरिता पालकांना प्रोत्साहन भत्त्याकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-११३) या खाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे क्र. ४५६/१४७५, दि. ६/७/२०१० व ४३२/व्यय-४, दि. १४/७/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०१००९२०२०२९०९००१**असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**(व्यंकटेश भट )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ,
प्रधान सचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई, त्यांना विनंती आहे की, मा.विधानसभा / विधानपरिषद सदस्यांना कृपया या शासन निर्णयाची प्रत वितरीत करावी,
शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ ), महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, प्रशासकीय इमारत ,मंत्रालयासमोर, मुंबई
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे-३०,
अध्यक्ष/सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे-५,
राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण परिषद, जवाहर बालभवन, मुंबई,
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा) नागपूर,
संचालक, लेखा व कोषागरे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अधिदोन व लेखा अधिकारी , मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई ,
सर्व जिल्हा कोषाधिकारी,
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषदा सर्व
वित्त विभाग (व्यय -४) (अर्थसंकल्प) (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.
* पत्राद्वारे.